मा.सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशाप्रमाणे राज्यातील दुय्यम न्यायालयातील कार्यरत न्यायिक अधिका-यांना मा. न्या.पद्नाभन समितीने केलेल्या शिफारशीनुसार सुधारीत वेतन लागू करण्याबाबत -

महाराष्ट्र शासन
विधी व न्याय विभाग,
शासन निर्णय क्रमांक : एचसीटी-२००९/प्रक्र.१४१/का-तीन
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक : २२ आक्टोंबर,२०१०.

पहा :- १) शासन निर्णय क्रमांक : एचसीटी-३००३/(६२)-तीन,दि.४ जुलै,२००३.
२) शासन निर्णय क्रमांक : एचसीटी-३००३/(६५)-तीन,दि.२१ जानेवारी,२००४.
३) मा.सर्वोच्च न्यायालयातील आय.ए.क्र.२४४ इन याचिका क्रमांक : १०२२/१९८९ वरील सर्वोच्च न्यायालयाचा दिनांक ४.५.२०१० चा न्याय निर्णय
४) मा.सर्वोच्च न्यायालयातील आय.ए.क्र.२४४ इन याचिका क्रमांक : १०२२/१९८९ वरील सर्वोच्च न्यायालयाचा दिनांक २.८.२०१० चा न्याय निर्णय.

**प्रस्तावना:-** आय.ए.क्र.२४४ इन याचिका क्रमांक : १०२२/१९८९ (अखिल भारतीय न्यायिक अधिका-यांची संघटना विरुध्द केंद्र शासन व इतर ) च्या अनुषंगाने दुय्यम न्यायालयातील न्यायिक अधिका-यांच्या वेतनश्रेणीत सुधारणा करण्यासाठी सर्वोच्च न्यायालयाने मा.न्यायमूर्ती पद्मनाभन समितीची स्थापना केली. मा. न्या.पद्मनाभन समितीने या संदर्भातील आपला अहवाल जुलै,२००९ मध्ये सर्वोच्च न्यायालयात सादर केला.

२. मा.न्या.पद्मनाभन समितीने दुय्यम न्यायालयातील न्यायिक अधिका-यांना द्यावयाच्या वेतन व भत्ते याबाबत केलेल्या शिफारशी स्विकारुन सदर शिफारशींची अंमलबजावणी करण्याबाबत मा.सर्वोच्च न्यायालयाने आपल्या दिनांक ४/५/२०१० व दिनांक २/८/२०१० च्या न्यायनिर्णयाव्दारे आदेश दिले आहेत.

३. सर्वोच्च न्यायालयाने दिनांक ४.५.२०१० च्या आदेशान्वये दुय्यम न्यायालयातील न्यायिक अधिका-यांच्या वेतनाबद्दल मा. न्या.पद्मनाभन समितीने केलेल्या शिफारशीनुसार दिनांक १.१.२००६ पासून सुधारित वेतनश्रेणी लागू करण्याबाबत तसेच थकबाकीची रक्कम दोन वित्तीय वर्षामध्ये अदा करण्यास व त्यापैकी ६० टक्के रक्कम रोखीमध्ये व ४० टक्के रक्कम भविष्य निर्वाह निधीमध्ये जमा करण्याबाबत सर्व राज्य शासनांना निर्देश दिले. तसेच मा. न्या.पद्मनाभन समितीच्या शिफारशीनुसार वेतन व वेतनाच्या थकबाकीसह सर्व देय रकमा दि.३१.३.२०११ पर्यंत अदा करण्याचे आदेश दिले आहेत. त्याअनुषंगाने राज्य शासनाने खालील प्रमाणे निर्णय घेतलेला आहे.

**शासन निर्णय :-** मा.सर्वोच्च न्यायालयाने आपल्या दिनांक ४.५.२०१० च्या व दि.२.८.२०१० च्या न्यायनिर्णयानुसार मा. न्या.पद्मनाभन समितीने केलेल्या वेतन व भत्त्याबाबतच्या शिफारशीप्रमाणे महाराष्ट्र शासन याव्दारे दुय्यम न्यायालयातील कार्यरत न्यायिक अधिकाऱ्यांना सुधारित वेतनश्रेणी दिनांक १.१.२००६ पासून देण्यास मंजूरी देत आहे.

## सुधारित वेतनश्रेणी

| अ. क्र. | पद | न्या.शेट्टी आयोगानुसार सध्याची वेतनश्रेणी | न्या.पद्मनाभन समितीच्या शिफारशीनुसारची वेतनश्रेणी |
|---|---|---|---|
| १ | दिवाणी न्यायाधीश (कनिष्ठ स्तर) | रु.९०००-२५०-१०७५०-३००-१३१५०-३५०-१४५५० | रु.२७७००-७७०-३३०९०-९२०-४०४५०-१०८०-४४७७० |
| २ | दिवाणी न्यायाधीश- (कनिष्ठ स्तर) कालबध्द पदोन्नती पहिला टप्पा | रु.१०७५०-३००-१३१५०-३५०-१४९०० | रु.३३०९०-९२०-४०४५०-१०८०- ४५८५० |
| ३ | दिवाणी न्यायाधीश (वरिष्ठ स्तर) कालबध्द पदोन्नती दुसरा टप्पा | रु.१२८५०-३००-१३१५०-३५०-१५९५०-४००-१७५५० | रु.३९५३०-९२०-४०४५०-१०८०-४९०९०-१२३०-५४०१० |
| ४ | दिवाणी न्यायाधीश (वरिष्ठ स्तर ) प्रथम प्रवेश | रु.१२८५०-३००-१३१५०-३५०-१५९५०-४००-१७५५० | रु.३९५३०-९२०-४०४५०-१०८०-४९०९०-१२३०-५४०१० |
| ५. | दिवाणी न्यायाधीश (वरिष्ठ स्तर ) पहिली आश्वासित प्रगतीयोजना | रु.१४२००-३५०-१५९५०-४००-१८३५० | रु.४३६९०-१०८०-४९०९०-१२३०- ५६४७० |
| ६ | जिल्हा न्यायाधीश (वरिष्ठ स्तर) दुसरी आश्वासित प्रगती योजना | रु.१६७५०-४००-१९१५०-४५०-२०५०० | रु.५१५५०-१२३०-५८९३०-१३८०- ६३०७० |
| ७ | जिल्हा न्यायाधीश प्रथम प्रवेश | रु.१६७५०-४००-१९१५०-४५०-२०५०० | रु.५१५५०-१२३०-५८९३०-१३८०-६३०७० |
| ८ | जिल्हा न्यायाधीश (निवड श्रेणी) | रु.१८७५०-४००-१९१५०-४५०-२१८५०-५००-२२८५० | रु.५७७००-१२३०-५८९३०-१३८०-६७२१०-१५४०-७०२९० |
| ९ | जिल्हा न्यायाधीश (उच्च समय श्रेणी) | रु.२२८५०-५००-२४८५० | रु.७०२९०-१५४०- ७६४५० |

२. मा.न्या.पद्मनाभन समितीने शिफारस केलेले वेतन आणि केंद्र शासनाच्या दराप्रमाणे सुधारित महागाई भत्ता दिनांक १ जानेवारी,२००६ पासून लागू करण्यात यावा. दिनांक १.१.२००६ ते दि. ३०.४.२०१० या कालावधीतील कार्यरत दुय्यम न्यायालयातील जे न्यायिक अधिकारी, वेतन व महागाई भत्त्याची

थकबाकी मिळण्यास पात्र असतील, त्यांना देय होणारी **थकबाकीची ६०% रक्कम रोखीने देण्यात यावी व उर्वरित ४०% रक्कम भविष्य निर्वाह निधीमध्ये जमा करण्यात यावी तसेच रोखीने दयावयाच्या व भविष्य निर्वाह निधीमध्ये जमा करावयाच्या अशा दोन्ही रकमांपैकी अर्धी रक्कम चालू आर्थिक वर्षात व अर्धी रक्कम पुढील आर्थिक वर्षात अदा / जमा करण्यात यावी. दिनांक १.५.२०१० पासून वेतन व महागाई भत्याची रक्कम रोखीने देण्यात यावी.**

३. शासन निर्णया संबंधातील विकल्प हा शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत उच्च न्यायालयाकडे सादर करणे आवश्यक आहे. विकल्पाचा नमुना या शासन निर्णयासोबतच्या जोडपत्र - एक नुसार आहे.

४. भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २३५ अनुसार दुय्यम न्यायालयातील न्यायिक अधिका-यावर नियंत्रण ठेवण्याचे अधिकार उच्च न्यायालयास आहेत. सबब, मा.न्या.पद्मनाभन समितीने केलेल्या शिफारशीच्या अनुषंगाने मा.सर्वोच्च न्यायालयाने दिलेल्या आदेशानुसार दुय्यम न्यायालयातील न्यायिक अधिका-यांचे दिनांक १.१.२००६ पासून व त्यानंतर कार्यरत व नव्याने नियुक्त झालेल्या दुय्यम न्यायालयातील न्यायिक अधिका-यांची वेतननिश्चिती मा.उच्च न्यायालय, मुंबई यांचेकडून करण्यात येईल व त्यासंदर्भातले सुधारित आदेश मा.उच्च न्यायालयाकडून काढण्यात येतील.

५. सदर खर्च हा विधी व न्याय विभागाच्या अर्थसंकल्पीय नियंत्रणाखालील न्यायिक अधिकाऱ्यांसाठी होणारा खर्च आहे. इतर मंत्रालयीन विभागांनी त्यांच्या नियंत्रणाखालील न्यायिक अधिकाऱ्यांसाठी होणाऱ्या खर्चाची स्वतंत्रपणे करावयाची आहे.

६. ज्या न्यायिक अधिका-यांनी सहाव्या वेतन आयोगाच्या एचसीटी २००८/३०५७/(२९४)/ का-तीन, दिनांक ०४ मार्च,२०१० च्या विधी व न्याय विभागाच्या शासन निर्णयानुसार दोन मूळ वेतन अग्रीम म्हणून घेतले असतील ती रक्कम त्यांना वर निर्देशीत केल्याप्रमाणे मिळणा-या सुधारीत वेतनाच्या रोख रक्कमेतून वजा करुन अदा करण्यात यावी. सदर अग्रीमाची रक्कम ज्या न्यायिक अधिका-यांनी घेतली नसेल त्यांच्याकडून लेखी प्रमाणपत्र (Undertaking) घेण्यात यावे.

७. यासाठी होणारा खर्च त्या त्या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

८. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.६१६/२०१०/का. व्यय-६, दि.१८.१०.२०१० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

९.  सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्यांचा संकेतांक २०१०१०२२१६३२५१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( विजय आचलिया )
**प्रधान सचिव व विधी परामर्शी**

**प्रति,**

मा. राज्यपालांचे सचिव
मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
मा. उप मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
मा. मंत्री (विधी व न्याय ) अणि त्यांचे स्वीय सहाय्यक
मा. राज्यमंत्री (विधी व न्याय ) अणि त्यांचे स्वीय सहाय्यक
महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई
प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई
प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई
महालेखापाल-एक /दोन (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र मुंबई /नागपूर
महालेखापाल-एक /दोन (लेखापरीक्षा ), महाराष्ट्र मुंबई /नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
प्रमुख न्यायाधीश, नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई
मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई
प्रमुख न्यायाधीश, कौटुंबिक न्यायालय, मुंबई / पुणे /नागपूर /औरंगाबाद/अमरावती /अकोला/ठाणे.
मुख्य न्यायाधीश, लघुवाद न्यायालय, मुंबई
सर्व जिल्हा व सत्र न्यायाधीश
संचालक, न्यायीक अधिकारी प्रशिक्षण संस्था, नागपूर
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
धर्मादाय आयुक्त, मुंबई
विधी व न्याय विभागातील सर्व शाखा व कार्यासने
विधी व न्याय विभाग / का.७ (आवश्यक त्या कार्यवाहीसाठी)
वित्त विभाग ( व्यय-६)
सर्व मंत्रालयीन विभाग
निवड नस्ती.

(शासन अधिसूचना, विधी व न्याय विभाग क्र. एचसीटी-२००९/प्रक्र.१४१/का-तीन,
दिनांक २२ ऑक्टोंबर, २०१० चे जोडपत्र )

# जोडपत्र - एक
# विकल्पाचा नमुना

१. (अ) अधिका-याचे नांव * श्री./श्रीमती--------------------------------------------------------
-----------------------------------------------------------

(ब) धारण केलेले पद ----------------------------------- कायम --------------------------
स्थानापन्न

(क)विद्यमान श्रेणी रु.-*-------------------------------------------------------------------

(ड) सुधारित श्रेणी रु.--------------------------------------------------------------------

(ई) कार्यालयाचे नांव ---------------------------------------------------------------------

२. मी,* श्री./श्रीमती ---------------------------------------------------------------------
--------------------------------------------------------------------------------------- या व्दारे :

* १ जानेवारी, २००६ पासून सुधारित वेतनश्रेणीत निवड करतो / करते.

* मी धारक करीत असलेल्या पदाची विद्यमान श्रेणी पुढीलप्रमाणे चालू ठेवण्याची निवड करतो / करते.

  * माझ्या पुढील वेतनवाढीच्या तारखेपर्यंत

  * माझे वेतन रु.------------------------------- पर्यंत वाढवणा-या माझ्या नंतरच्या वेतनवाढीच्या तारखेपर्यंत.

  * मी पद रिक्त करेपर्यंत किंवा विद्यमान श्रेणीत वेतन घेण्याचे बंद करेपर्यंत

३. हा विकल्प अंतिम असून त्यामध्ये हया तारखेनंतर सुधारणा करण्यात येणार नाही.

सही

ठिकाण :
दिनांक :

नांव

-----------------------------------------------------------------------------------------

(कार्यालयाने भरावयाचे )

प्रमाणित करण्यात येते की, कायम -----------------------------------------------------------------
स्थानापन्न
पद धारण करीत असलेल्या ) श्री./श्रीमती -------------------------------------------------------------

हयांनी, हा विकल्प , यथोचितरित्या स्वाक्षरीसह व विहित दिनांकापूर्वी मला सादर केला आहे.

सही

ठिकाण :
दिनांक :

नांव ---------------------------------

कार्यालयाचे प्रमुख -----------------